कृषी उन्नती योजना - राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान (तेलबिया व वृक्षजन्य तेलबिया) अंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गाचा सन २०१८-१९करिता ₹ १९०८.८१७ लाख निधी वितरीत करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : रागते-१०१८/प्र.क्र.७१/४अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १० जानेवारी, २०१९.

**वाचा:-**

१. केंद्र शासनाचे अभियाना संदर्भात http://agricoop.nic.in/dacdiviion/dacdiviion/NMOOP२०१४.pdf या संकेतस्थळावर उपलब्ध करुन दिलेल्या मार्गदर्शक सूचना
२. वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३दि.०२/०४/२०१८.
३. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.०४१८/प्र .क्र१५५/१४-अे,दि.२७/०४/२०१८.
४. केंद्र शासनाचे पत्र क्र.४-१/२०१८-NFSM(OS &OP),दि.०८ मार्च, २०१८.
५. केंद्र शासनाचे पत्र क्र.४-१/२०१८-NFSM(OS &OP),दि.०२ मे, २०१८.
६. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.अेअेपी-२०१८/प्र.क्र.४६/४-अे, दिनांक १६ मे, २०१८.
७. केंद्र शासनाचे पत्र क्र.६-१३/२०१८-AAP/(COORD/OS),दि.११ जून, २०१८.
८. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.अेअेपी-२०१८/प्र.क्र.४६/४-अे, दिनांक २० जून,२०१८.
९. केंद्रीय कृषी मंत्रालयाचे पत्र-१४-१/२०१८-CA-II, दिनांक ०५ डिसेंबर, २०१८.
१०. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.वि.प्र.२/राअसु(गळीत)१८-१९/वि.मा.दु.हप्ता/प्र.क्र.०६/३५१/१८, दि.१७ डिसेंबर, २०१८.

**प्रस्तावना :-**

तेलबियांच्या उत्पादनात वाढ करण्यासाठी केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियान [National Mission on Oilseed and Oil Palm (NMOOP)] सन २०१४-१५ पासून राज्यात राबविण्यात येत आहे. सदर अभियानाअंतर्गत लघुअभियान-१ (तेलबिया), लघुअभियान-२ (तेलताड) व लघुअभियान-३ (वृक्षआधारित तेलबिया) या तीन लघुअभियानांचा समावेश आहे.तथापि, राज्यात लघुअभियान-१ व लघुअभियान-३ या दोनच अभियानाची अंमलबजावणी करण्यात येत आहे. यामध्ये केंद्र व राज्य हिश्श्याचे प्रमाण ६०:४० असे आहे.

केंद्र शासनाने दि.०८/०३/२०१८ च्या पत्रान्वये पूर्वीचे राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियानाचा सन २०१८-१९ पासून राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान (गळीतधान्य व तेलताड)अंतर्गत अभियान-१ (तेलबिया) व अभियान-३ (वृक्षजन्य तेलबिया) म्हणून समावेश केला आहे. सदर योजनेचा केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा (६०:४०) पूर्वी प्रमाणेच राहील.

केंद्र शासनाने सदर अभियान सन २०१८-१९ या वर्षात राबविण्यासाठी दि.०२ मे, २०१८ च्या पत्रान्वये ₹ ६९०४.९८ लाख एवढया रकमेच्या कार्यक्रमास मान्यता दिलेली आहे. यामध्ये केंद्र हिस्सा ₹ ४१७४.९८ लाख व

राज्य हिस्सा ₹ २७३०.०० लाख एवढया रकमेचा समावेश आहे. सदर कार्यक्रमास दि.१६ मे, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. केंद्र शासनाने सदर अभियान सन २०१८-१९ या वर्षात राबविण्यासाठी दि.११ जून, २०१८ च्या पत्रान्वये गतवर्षीच्या प्रलंबित दायीत्वासह ₹७९००.९१ लाख एवढया रकमेच्या कार्यक्रमास सुधारीत मान्यता दिलेली आहे. यामध्ये केंद्र हिस्सा ₹४८५६.०० लाख व राज्य हिस्सा ₹३०४४.९१ लाख एवढया रकमेचा समावेश आहे. सदर कार्यक्रमास दि.२० जून, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

केंद्र शासनाने संदर्भीय दिनांक ०५ डिसेंबर, २०१८ च्या पत्रान्वये अभियानासाठी ₹१४५३.४२ लाख रकमेचा दुसऱ्या हप्त्याचा निधी मुक्त केलेला आहे. केंद्र शासनाने मुक्त केलेल्या दुसऱ्या हप्त्याच्या निधीमध्ये सर्वसाधारण प्रवर्गाकरीता अभियान-१ (तेलबिया) साठी ₹ ११३१.९७ लाख व अभियान-३ (वृक्षजन्य तेलबिया) साठी ₹ १३.३२ लाख असा एकुण ₹११४५.२९ लाख केंद्र हिस्सा निधाचा अंतर्भाव आहे. केंद्र शासनाने सर्वसाधारण प्रवर्गासाठी मुक्त केलेला केंद्र हिश्याचा निधी ₹ ११४५.२९ लाख व त्यास समरूप राज्य हिश्याचा निधी ₹७६३.५२७ लाख अशा एकूण रु.१९०८.८१७ लाख निधीस वित्तीय मान्यता प्रदान करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे,

**शासन निर्णयः**

१. सन २०१८-१९ मध्ये कृषी उन्नती योजना-राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान (तेलबिया व वृक्षजन्य तेलबिया) राज्यात राबविण्यासाठी **सर्वसाधारण प्रवर्गाकरिता** केंद्र व राज्य हिस्स्याचा मिळून **एकूण ₹ १९०८.८१७ लाख (अक्षरी रुपये एकोणीस कोटी आठ लाख एक्याऐंशी हजार सातशे फक्त)** निधीच्या वितरणास मान्यता देण्यात येत आहे.सदर एकूण निधीत केंद्र व राज्य हिश्याच्या निधीचे विवरण पुढीलप्रमाणे-

**(रु.लाख)**

| अ. क्र. | राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान- तेलबिया व तेलताड अभियान | सर्वसाधारण प्रवर्ग | | एकूण |
|---|---|---|---|---|
| | | केंद्र हिस्सा (६०%) | राज्य हिस्सा (४० %) | |
| १ | अभियानक्र.१ (तेलबिया) | ११३१.९७ | ७५४.६४७ | १८८६.६१७ |
| २ | अभियानक्र.३ ( वृक्षजन्य तेलबिया) | १३.३२ | ८.८८ | २२.२ |
| | **एकूण** | **११४५.२९** | **७६३.५२७** | **१९०८.८१७** |

२. परि.क्र.१ नुसार कृषी उन्नती योजना-राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत **अभियान-१ (तेलबिया)** करीता उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीपैकी केंद्र हिस्याचा **निधी ₹११३१.९७ लाख (रुपये अकरा कोटी एकतीस लाख सत्त्याण्णव हजार फक्त)** आयुक्त (कृषी) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे वितरीत करण्यात येत असून त्यांनी सदर निधी याच प्रणालीद्वारे विभागीय कृषी सहसंचालक यांचेमार्फत जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी स्तरावर वितरीत करावा व खालील लेखाशिर्षांतर्गत सन २०१८-१९ करिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतुदीतून जिल्हास्तरावर PFMS प्रणालीद्वारे खर्ची टाकावा-:

**मागणी क्रमांक डी-३**
**२४०१- पीक संवर्धन**
**११४, तेलबिया**
**(००) (०६) राष्ट्रीय तेलबिया व तेलताड लघु अभियान-१) तेलबिया**
**(के.पु.यो.) (केंद्र हिस्सा) (६०% )**
**(२४०१ २४९८) ३३,अर्थसहाय्य**

३. परि.क्र.१ नुसार कृषी उन्नती योजना-राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान **अभियान-३ (वृक्षजन्य तेलबिया)** करीता उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीपैकी केंद्र हिस्याचा **₹१३.३२ लाख निधी (रुपये तेरा लाख बत्तीस हजार फक्त)** आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे वितरीत करण्यात येत असून सदर निधी परि.क्र.२ मध्ये नमूद केलेल्या पध्दतीने खालील लेखाशिर्षांतर्गत सन २०१८-१९ करिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतुदीतून जिल्हास्तरावर PFMS प्रणालीद्वारे खर्ची टाकावा:-

**मागणी क्रमांक डी-३**
**२४०१- पीक संवर्धन**
**११४, तेलबिया**
**(००) (०६) राष्ट्रीय तेलबिया व तेलताड लघु अभियान-३**
**(वृक्ष आधारित तेलबिया) (डी.एस.ए.ओ)**
**(के.पु.यो.) (केंद्र हिस्सा) (६०% )**
**(२४०१ ९४९२) ३३, अर्थसहाय्य**

तसेच, कृषी उन्नती योजना-राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान (तेलबिया व वृक्षजन्य तेलबिया) करिता वितरणास मान्यता देण्यात आलेला राज्य हिस्स्याचा ₹**७६३.५२७ लक्ष (अक्षरी रुपये सात कोटी त्रेसष्ट लाख बावन्न हजार सातशे फक्त)** निधी जिल्हा स्तरावर जिल्हा नियोजन व विकास समितीच्या **(DPDC)** सन २०१८-१९ करिता अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या तरतुदीतून जिल्हास्तरावर PFMS प्रणालीद्वारे खर्ची टाकावा.

४. या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेल्या केंद्र हिस्स्याच्या निधीच्या प्रमाणात आवश्यक राज्य हिस्स्याच्या निधीस जिल्हा नियोजन व विकास समितीच्या (DPDC) अखत्यारीतील तरतूदीस संबंधित जिल्हाधिकारी यांचेकडून वित्तीय मान्यता देण्यात यावी.

५. या शासन निर्णयान्वये राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत (तेलबिया व वृक्षजन्य तेलबिया) करिता उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या केंद्र व राज्य हिस्स्याच्या **₹१९०८.८१७ लाख** रक्कमेचे जिल्हा निहाय/ कार्यालय निहाय वाटप करण्याकरिता संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांनी अभियानांतर्गत जिल्हानिहाय वाटप करावयाचा निधी BDS प्रणालीद्वारे विभागीय कृषि सहसंचालकामार्फत जिल्हयांना वितरीत करावा व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी यांनी अदायगी PFMS प्रणालीद्वारेच करावी.

६. सदर निधी खर्च करताना संदर्भाधीन अ.क्र.१ येथील अभियानाच्या मार्गदर्शक सूचना अ.क्र.३ येथील दि.२७ एप्रिल, २०१८ च्या शासन निर्णय व संदर्भाधीन अ.क्र.६ येथील दि.१६ मे, २०१८ च्या शासन निर्णयातील अटी, शर्ती व विहित कार्य पध्दतीचे कटाक्षाने पालन करण्यात यावे.

७. हा शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३ दि. ०२ एप्रिल, २०१८ नुसार विहीत केलेल्या अटींची पुर्तता होत असल्याने तसेच, सदर परिपत्रकानुसार या विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११०११५७०५०४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2019.01.10 17:20:14 +05'30'

**( श्रीकांत चं. आंडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१. मा.मंत्री (कृषि)यांचेस्वीयसहायक ,मंत्रालय,मुंबई.
२.मा.राज्यमंत्री(कृषि)यांचेस्वीयसहायक ,मंत्रालय,मुंबई.
३.मा.विरोधीपक्षनेता ,विधानसभा ,विधानमंडळसचिवालय ,मुंबई
४. मा.विरोधीपक्षनेता ,विधानपरिषद ,विधानमंडळसचिवालय ,मुंबई
५.अपर मुख्य सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६.आयुक्त (कृषी) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
७.संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे
८.सहसंचालक (नियोजन), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे-१
९.जिल्हाधिकारी, (सर्व)
१०.विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)
११.जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
१२.जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१३.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, शास्त्रीनगर, अकोला.
१४.सहसंचालक लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन,पाचवा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई
१५.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र १ /२, मुंबई / नागपूर
१६.महालेखाकार ( स्थानीय निकाय लेखापरिक्षा व लेखा), प्रतिष्ठा भवन,१०१ महर्षी कर्वे मार्ग, मुंबई-४०० ०२०
१७.नियोजन विभाग (कार्यासन - १४३१ /कार्यासन - १४४४), मंत्रालय, मुंबई - ३२
१८.वित्त विभाग (व्यय-१) /अर्थसंकल्प -१३
१९.सामाजिक न्याय, क्रिडा व विशेष सहाय्य विभाग/आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२०.ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई
२१. निवडनस्ती (कार्यासन-४अे), कृषी व पदुम विभाग.